**राष्ट्रीय फलोत्पादन अभियान अंतर्गत अळींबी उत्पादन प्रकल्पांतर्गत येरवडा खुले कारागृह, येरवडा, पुणे येथे यंत्रसामुग्री व पुरक बाबी खरेदी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.२०४/तुरुंग-२**
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: ७ जानेवारी, २०१५

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. शेती/रा.फ.अ/१०३२४/२०१४-१५/कक्ष-७, दिनांक १.१०.२०१४.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. मराफऔवमं/क्षेवि/ मशरूम/ तां.मं/अ.वि./२८८५/२०१४, दिनांक १९.७.२०१४.

**शासन निर्णय**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या वाचा-२ येथील आदेशान्वये येरवडा खुले कारागृह, पुणे करीता एकात्मिक फलोत्पादन अभियान अंतर्गत अळींबी उत्पादन प्रकल्प उभारणी करण्यासाठी १०० % अनुदानावर एकूण रू. २०.०० लक्ष अर्थसहाय्य मंजूर झालेले आहे. सदर प्रकल्पास कृषी विभागाने तांत्रिक मंजूरी दिलेली असून सदर प्रकल्पाच्या बांधकामाव्यतिरीक्त यंत्रसामुग्री व पुरक बाबी खरेदीसाठी अंदाजित रक्कम रू.६,१६,७५६/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता मिळण्याची अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वाचा-१ येथील पत्रान्वये प्रस्तावित केले आहे.

२. वित्त विभाग, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७९, भाग पहिला उप विभाग-२, अनु.३ नियम ७ अन्वये त्यांच्या नियंत्रणाखालील संस्थेतील उद्योगधंद्यासाठी लागणारी नवीन सयंत्रे, सामग्री किंवा फर्निचर धरून इतर साधन सामग्री विकत घेण्यास मंजूरी देणेचे पूर्ण अधिकार प्रशासनिक विभागास आहेत.

३. यास्तव येरवडा खुले कारागृह, येरवडा, पुणे कारागृहाकरीता वाचा -२ येथील तांत्रिक मंजुरी आदेशातील अटीं व शर्तीच्या अधीन, व सदरहू उपकरणांची खरेदी शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार व नियमानुसार करण्याच्या अटीवर अळींबी उत्पादन प्रकल्पाच्या बांधकामाव्यतिरीक्त यंत्रसामुग्री व पुरक बाबी खरेदीसाठी अंदाजित रक्कम रू.६,१६,७५६/- (रूपये सहा लक्ष सोळा हजार सातशे छपन्न फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०१०८१०२६०३३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.01.08 16:32:50 +05'30'

**( ज.ल.पावरा )**
शासनाचे उप सचिव

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
- कारागृह अधीक्षक, खुले कारागृह, येरवडा, पुणे,
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- निवड नस्ती (तुरुंग-२).